महिला व बाल विकास विभागाच्या अधिपत्याखालील महिला व बाल विकास आयुक्तालय कार्यालयातील बालविकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण), गट-ब या पदावर प्रतिनियुक्ती देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. मबाआ-२०२२/प्र.क्र.५५/का-७अ**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: १०.०३.२०२३.

वाचा:- १) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. मविसे १०/ प्र.क्र.४४/३ (आस्था)-३अ, दि. २८.०५.२०१३,
२) सामान्य प्रशासन विभाग पत्र क्र. कअनि-११२२/प्र.क्र.७६/१४-ब, दि.२७.११.२०२२,
३) सामान्य प्रशासन विभाग, आदेश क्र.कअनि-११२२/प्र.क्र.७६/१४-ब, दि.२९.१२.२०२२.

**शासन निर्णय:-**

ग्राम विकास विभागाच्या दि. २८/५/२०१३ च्या शासन निर्णयान्वये कडून ग्राम विकास विभागाकडील गट-ब संवर्गातील बाल विकास प्रकल्प अधिकारी यांची पदे महिला व बाल विकास विभागाकडे कायमस्वरुपी वर्ग करण्यात आलेली आहेत. ग्राम विकास विभागाकडून या विभागाकडे हस्तांतर करण्यात आलेल्या बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण), वर्ग-२ पदांमध्ये रिक्त पदांचे प्रमाण अधिक असल्याने सामान्य प्रशासन विभागाने सदर पदांपैकी सरळसेवेच्या कोटयातील रिक्त पदे प्रतिनियुक्तीने भरण्यास सहमती दिली आहे. सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२७.११.२०२२ च्या पत्रान्वये बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण), तालुका वैभववाडी, जिल्हा सिंधुदुर्ग हे पद प्रतिनियुक्तीने भरण्याच्या अनुषंगाने मंत्रालयीन संवर्गातील कक्ष अधिकाऱ्यांकडून इच्छुकता मागविण्यात आली. सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२९.१२.२०२२ च्या आदेशान्वये महिला व बाल विकास विभागाच्या अधिपत्याखालील महिला व बाल विकास आयुक्तालय कार्यालयातील बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण), गट-ब ( वेतनश्रेणी रु.९३००-३४८०० ग्रेड पे ४४००) या पदावर खालील अधिकाऱ्यांची सेवा प्रथमत: एक वर्षासाठी प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन देण्यात आली आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | सध्याचा विभाग | प्रतिनियुक्तीने नियुक्तीचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | श्रीमती वैशाली अ.काकडे, कक्ष अधिकारी | अल्पसंख्यांक विकास विभाग | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण), तालुका वैभववाडी, जिल्हा सिंधुदुर्ग |

सदर अधिकाऱ्याच्या प्रतिनियुक्तीवरील सेवा खालील अटी व शर्तींच्या अधीन राहतील:-

अ) उपरोक्त अधिकारी ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल. त्यानंतर प्रतिनियुक्तीच्या पदाचा कार्यभार सुपूर्द करुन त्यांच्या मूळ विभागात ज्या तारखेला रुजू होतील त्या तारखेला त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होईल.

ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकारी राखून ठेवील.

क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर, त्यांना मूळ विभागाकडे परत पाठवण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठवण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला/ सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

ड) त्यांनी "मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे" अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/ सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. उपरोक्त अधिकाऱ्यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी अल्पसंख्यांक विकास विभाग यांच्यामार्फत हाताळण्यात येतील.

३. बाल विकास प्रकल्प अधिकारी, गट-ब (वेतनश्रेणी रु. ९३००-३४८०० ग्रेड पे ४४००) हे पद तात्पुरत्या स्वरुपात श्रेणी उन्नत करुन सदर पदावर श्रीमती वैशाली अ.काकडे, कक्ष अधिकारी, अल्पसंख्यांक विकास विभाग यांची त्यांच्या विद्यमान वेतनश्रेणीत प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यास वित्त विभागाच्या अनौ सं.क्र.३१/२०२३/सेवा ९ दि.०२.०२.२०२३ च्या अभिप्रायानुसार आदेशाद्वारे मान्यता देण्यात येत आहे. श्रेणी उन्नत केलेले बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण) हे पद उपरोक्त अधिकारी हे त्या पदावर असे पर्यंत अस्तित्वात राहील. त्यानंतर हे पद आपोआप मूळ संवर्गात श्रेणी अवनत होईल.

४. बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण), तालुका वैभववाडी, जिल्हा सिंधुदुर्ग हे पूर्णत: शासकीय असल्याने उपरोक्त परि.क्र १ मध्ये नमूद केलेल्या अधिका-यांना प्रतिनियुक्ती भत्ता अनुज्ञेय असणार नाही. तसेच वेतन,भत्ते, रजा,प्रवास सवलत, वैद्यकीय सवलत, गटविमा योजना इ. सेवाविषयक बाबी संदर्भात त्यांना त्यांच्या मूळ सेवेचे नियम लागू असतील.

५. श्रीमती वैशाली अ.काकडे, कक्ष अधिकारी, अल्पसंख्यांक विकास विभाग यांची नियुक्ती दिनांक ०१.११.२००५ पूर्वीची असल्यामुळे महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन नियम) १९८२ मधील तरतुदीप्रमाणे त्यांचे सेवा निवृत्ती वेतन विषयक लाभ नियमित करण्यात येतील.

६. संबंधित अधिका-यांनी नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजू होऊन तसा अनुपालन आयुक्त, महिला व बाल विकास यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

महिला व बालविकास आयुक्तालय या कार्यालयातील बालविकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण) या पदावर अधिकाऱ्यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यास शासनाची देखील मान्यता घेण्यात आली आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२४१२२०३९५८३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SUNIL DEORAO SARDAR

Digitally signed by SUNIL DEORAO SARDAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=c0098eb68042c66b72115bc62ef9206ece42981aab126657128d7cadca447533, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=778B75C2C14BADBE6832D77601CF425AA7979B907650965C83919DBA7DC458C7, cn=SUNIL DEORAO SARDAR
Date: 2023.03.24 12:25:26 +05'30'

**( सुनिल सरदार )**
**अवर सचिव, महिला व बाल विकास विभाग**

**प्रति,**

श्रीमती वैशाली अ.काकडे, कक्ष अधिकारी, विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**प्रत,**

१. मा.मंत्री (म.व बा.वि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ३२,
२. अ.मु.स.(सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२ यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,
३. प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२ यांचे स्वीय सहायक,
४. प्रधान सचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,
५. आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना, पुणे,
६. आयुक्त,महिला व बाल विकास, पुणे,
७. सह /उप सचिव (आस्थापना), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
८. विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास, कोकण विभाग, नवी मुंबई,
९. उपमुख्य कार्यकारी अधिकारी, ( बा.क.), जिल्हा परिषद,सिंधुदुर्ग,
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग,
११. निवडनस्ती (कार्यासन-७अ), महिला व बाल विकास विभाग.